**मुंबई शहरातील घोडागाडी व्यवसायावर अवलंबून असणाऱ्या कुटुंबांचे पुनर्वसन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-१०१५/प्र.क्र. ३७९/पोल-८**
गृह विभाग, दुसरा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२
तारीख: १६ जून, २०१७

**वाचा :-** शासन निर्णय गृह विभाग क्रमांक: न्यायप्र-१०१५/ प्र.क्र.३७९/ पोल-८, दि.०९.११.२०१६

**प्रस्तावना :-**

ॲनिमल ॲण्ड बर्ड चॅरिटेबल ट्रस्ट व इतर यांनी बृहन्मुंबई महानगरपालिका व इतर यांच्या विरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र. ३६/२०११ दाखल केली होती. या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दिनांक ८ जून, २०१५ रोजी आदेश पारीत केले आहेत. मा. न्यायालयाच्या आदेशांच्या अमंलबजावणीच्या अनुषंगाने मुख्य सचिव तसेच अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली अनेक बैठका आयोजित करण्यात आल्या. तद्नुषंगाने, राज्य मंत्रिमंडळाच्या विचारार्थ सादर करण्यात आलेल्या प्रस्तावाचा सर्वंकष अभ्यास करण्यासाठी मंत्रिमंडळ उप समिती दि.९.११.२०१६ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली होती. सदरहू मंत्रिमंडळ उपसमितीने केलेल्या शिफारशी पुढीलप्रमाणे आहेत.

**<u>मंत्रीमंडळ उपसमितीने केलेल्या शिफारशी :-</u>**

(१) नगर विकास विभागाने, राज्यात पथविक्रेता (उपजिविका संरक्षण व पथविक्री विनियम) (महाराष्ट्र) योजना, २०१७, दिनांक ०९ जानेवारी, २०१७ रोजी प्रसिध्द केलेली आहे. सदर योजनेतील परिच्छेद क्र. ३.३ (vi) मध्ये करण्यात आलेल्या तरतुदीप्रमाणे लाभार्थ्यांना बृहन्मुंबईमध्ये उपलब्ध असलेल्या जागेवर पथविक्रेता (फेरीवाला) प्रमाणपत्र देण्यात यावे. तसेच रुपये १.०० लक्ष (एक वेळची एक रकमी ) आर्थिक मदत देण्यात यावी.

किंवा

(२) रु.३,००,०००/- (रु.तीन लक्ष) एक वेळची एक रकमी आर्थिक मदत देण्यात यावी.

(३) ज्या घोडागाडी मालकाकडे एका पेक्षा अधिक घोडागाडी परवाने आहेत, अशा घोडागाडी मालकास किवा त्यांने नामनिर्देशीत केलेल्या कुटुंबातील एका व्यक्तीसच लाभार्थी ग्राह्य धरण्यांत यावे.

(४) हयात असलेल्या ज्या घोडागाडी मालक / चालकांनी त्यांच्या ऐवजी कुटुंबातील कोणत्याही व्यक्तीस लाभार्थी म्हणून नामनिर्देशीत केल्यास अशा नामनिर्देशीत व्यक्तीस लाभार्थी म्हणून ग्राह्य धरण्यांत यावे.

(५) मयत झालेल्या घोडागाडी मालक / चालकांच्या बाबतीत त्यांच्या कुटुंबातील सर्व व्यक्तींनी एक मताने नामनिर्देशीत केलेल्या व्यक्तीस लाभार्थी म्हणून ग्राह्य धरण्यांत यावे.

(६) लाभ देणाऱ्या प्राधिकरणाने घोडागाडी मालक / चालक / वारस / नामनिर्देशित केलेली व्यक्ती यांच्या बाबतची आवश्यक ती कागदपत्रे तपासून, ती व्यक्ती पात्र असल्याचे खात्री करुनच लाभार्थींना लाभ मंजूर करावा.

(७) लाभ देणाऱ्या प्राधिकरणाने वादग्रस्त प्रकरणांमध्ये सर्व संबंधिताची म्हणणे एकूण घेऊन नियमानुसार त्यांच्या स्तरावर योग्य तो निर्णय घ्यावा.

सदरहू शिफारशींस अनुसरुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई  येथे दाखल जनहित याचिका क्र. ३६/२०११ प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दि.०८ जून, २०१५ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने बाधित झालेल्या संबंधित घोडागाडी चालक व मालक यांचे पुनर्वसन मंत्रिमंडळ उपसमितीच्या शिफारशीमधील नमूद अटींच्या अधिन राहून, पुढीलप्रमाणे करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) मा. न्यायालयाच्या आदेशानुसार  घोडागाडीचा व्यवसाय बंद करण्याच्या निर्णयामुळे बाधित झालेल्या संबंधित घोडागाडी चालक व मालक यांना व्यवसायबाधित व्यक्ती म्हणुन, मंत्रीमंडळ उपसमितीच्या शिफारशीनुसार नगरविकास विभागाने, राज्यात पथविक्रेता (उपजिविका संरक्षण व पथविक्री विनियम) (महाराष्ट्र)  योजना, २०१७,  दि. ९ जानेवारी, २०१७ रोजी प्रसिध्द केलेल्या सदर योजनेतील परिच्छेद क्र.३.३ (vi) मध्ये करण्यात आलेल्या तरतूदीप्रमाणे लाभार्थ्यांना "बृहन्मुंबईमध्ये उपलब्ध असलेल्या जागेवर पथविक्रेता (फेरीवाला) प्रमाणपत्र देण्यात यावे तसेच रु. १.०० लक्ष (एक वेळची एक रकमी) आर्थिक मदत देण्यात यावी" **किंवा** "रु.३,००,०००/- (तीन लक्ष) एक वेळची एक रकमी आर्थिक मदत देण्यात यावी"

(२) घोडयांच्या पुनर्वसनासाठी संबंधीत घोडेमालकांनी घोडयांची विक्री करावी अथवा सदर घोडयांचा सांभाळ करण्यास इच्छूक असलेल्या स्वयंसेवी संस्थेस हे घोडे बृहन्मुंबई

महानगरपालिकेमार्फत घोडागाडी मालकांच्या संमतीने सुपुर्द करण्यात यावेत. याबाबतची संपूर्ण कार्यवाही बृहन्मुंबई महानगरपालिकेने करावी. तसेच या संपूर्ण प्रक्रियेत घोडयांच्या जिविताची सुरक्षा व आरोग्याची जपणूक होण्याच्या दृष्टीने पशुसंवर्धन विभागाने समग्र धोरण योजना आखण्यास मंजूरी देण्यांत येत आहे.

(३) पथविक्रेता (फेरीवाला) प्रमाणपत्र देण्यासंदर्भातील कार्यवाही मंत्रिमंडळ उपसमितीच्या शिफारशी विचारात घेऊन बृहन्मुंबई महानगरपालिकेने करावी.

(४) मंत्रिमंडळ उपसमितीच्या शिफारशीनुसार द्यावयाच्या आर्थिक मदतीकरिता आवश्यक रकमेची तरतूद नगरविकास विभागाच्या अर्थसंकल्पात करुन ती बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत संबंधित लाभधारकास वितरीत करण्याची कार्यवाही करण्यास मान्यता देण्यांत येत आहे.

(५) या प्रयोजनार्थ येणारा वित्तीय भार किमान रु. २.२१ कोटी व कमाल रु. ६.६३ कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१५१५५५४५११२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: CN = Yuvraj B Ajetrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2017.06.16 16:08:57 +05'30'

**युवराज ब. अजेटराव**
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
६. प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई

८. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

९. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई

१०. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

११. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई

१२. सह पोलिस आयुक्त (वाहतूक), मुंबई

१३. मा.राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१४.प्रतिनिधी, ॲनिमल ॲण्ड बर्ड चॅरिटेबल ट्रस्ट, मुंबई.

१५.प्रतिनिधी, पेटा (स्वयंसेवी संघटना)

१६. निवडनस्ती, पोल-८.